**विडी कामगारांच्या जेलभरो आंदोलनात भाग घेतलेल्या सत्याग्रहयांसाठी दिनांक २६.७.१९९७ रोजी कोपरगांव येथे पोहोचविण्याकरिता प्रासंगिक करारावर भाडयाने घेतलेल्या महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेस गाडयांचे भाडे रु.९,९२०/- अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०११९/१२(५४)/पीआरएस-२**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २८ नोव्हेंबर २०००.**

**वाचा - (१) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-संकीर्ण/एसटी भाडे बुका कोपरगाव/कक्ष-३ (११०) दिनांक २३.८.२०००.**

**<u>शासन निर्णय :-</u>** विडी कामगारांच्या जेलभरो आंदोलनात भाग घेतलेल्या एकूण २७५ विडी कामगार सत्याग्रहयांसाठी दिनांक २६.७.१९९७ रोजी कोपरगांव या त्यांच्या स्वग्रामी पोहोचविणेसाठी ५ एस.टी.बसेस गाडया महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाकडून प्रासंगिक करारावर घेण्यांत आल्या होत्या. त्याकरिता एस.टी.महामंडळास भाडयापोटी रु.९,९२०/- (रुपये नऊ हजार नऊशे वीस फक्त) एवढी रक्कम अदा करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, विडी कामगारांच्या जेलभरो आंदोलनात भाग घेतलेल्या एकूण २७५ विडी कामगार सत्याग्रहयांसाठी दिनांक २६.७.१९९७ रोजी कोपरगांव या त्यांच्या स्वग्रामी पोहोचविण्यासाठी पाच (५) एस.टी.गाडया प्रासंगिक कराराने घेतल्यामुळे महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास भाडयापोटी रु.९,९२०/- (रुपये नऊ हजार नऊशे वीस फक्त) एवढी रक्कम अदा करण्यास शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे. ही रक्कम तात्काळ महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यात यावी.

यासाठी होणारा खर्च "२०५६" (२६०५) तुरुंग,००१-तुरुंग संचालनालय व प्रशासन,००१ (एक) कारागृह निरीक्षणालय" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०००-२००१ या चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-८६५/२०००/ व्यय-८ दिनांक ३०.९.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सु.म.माने )**
**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

प्रति,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय),महाराष्ट्र राज्य,पुणे.

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई.

महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.

निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.

उपमहाव्यवस्थापक (वाहतूक) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,पुणे.

कोषागार अधिकारी,पुणे.

वित्त विभाग (व्यय-८)

गृह विभाग,बीयुडी-१.

निवडनस्ती.